**मुंबई सीसीटीव्ही प्रकल्पाचा कार्यान्वयन देखभाल दुरुस्तीच्या (operation & Maintenance) ६ व्या वर्षाच्या कालावधीसाठी येणा-या रु.९०,३५,५८,९९३/- (जीएसटी वगळून) इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-१०२२/प्र. क्र. ११९/पोल-३**

गृह विभाग, २ रा मजला,

मंत्रालय, मुंबई-**४०० ०३२**

दिनांक: २९/३/२०२३

वाचा -

१) **गृह विभाग, शासन निर्णय क्र**. आयएसएस १००९/प्र.क्र.३१३/विशा-४, दि.२७.०७.२०११.

२) गृह विभाग, शासन निर्णय क्र.आयएसएस-१००९/प्र.क्र.३१३ (भाग-२)/विशा-४, दि.६.०१.२०१२.

३) महाराष्ट्र शासन आणि मे. लार्सन अँड टुब्रो कंपनी यांचे दरम्यान दि.७.२.२०१५ रोजी झालेला करार.

४) शासनाचे क्र.सीसीटी ३११५/प्र.क्र.२१/पोल-३,दि.७.२.२०१५ चे कार्यादेश.

५) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दि.१७.०४.२०१५

६) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि.१८.४.२०१७

७) गृह विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१५/प्र. क्र. ६४/विशा -३(अ), दि.०४.०८.२०१७.

८) गृह विभाग, शासन पत्र क्र.३११५/प्र.क्र.२१/भाग-२/पोल-३, दिनांक ०८.११.२०१७.

९) गृह विभाग, शासन निर्णय क्र.सीसीटी-३११५/प्र.क्र.२१/भाग-२/पोल-३, दि.०५.११.२०१८.

१०) गृह विभाग, शासन निर्णय क्र.सीसीटी-३११५/प्र.क्र.२१/भाग-२/पोल-३, दि.२६/२/२०१९

११) अ.मु.स. (गृह) यांच्या अध्यक्षतेखाली दि.२२/९/२०२२ रोजी झालेल्या उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीचे इतिवृत्त दि.२०/१०/२०२२ चे पत्र

१२) गृह विभाग पत्र क्र.No.MIS ३६१९/C.R.६६/Pol ३, दि.१९/१०/२०२२

१३) पोलीस उपायुक्त (अभियान) मुंबई शहर यांचे पत्र क्र.पोउआ/अभियान/४०७ व ५५२/२०२३, दिनांक ८/२/२०२३ व दि.२/३/२०२३ रोजीचे पत्र.

१४) अ.मु.स. (गृह) यांच्या अध्यक्षतेखाली दि.१४/३/२०२३ रोजी झालेल्या उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीचे इतिवृत्त दि.२७/३/२०२३ चे पत्र

<u>प्रस्तावना</u>-

मुंबई शहरात सुरक्षेच्या दृष्टीने सीसीटीव्ही कॅमेरे बसविण्यासाठी मे. लार्सन ॲन्ड टुब्रो कंपनी लि. या कंपनीसोबत दि.०७.०२.२०१५ रोजी शासनाने करार केला आहे. सदर करारानुसार गृह विभाग शासन निर्णय दि. ०५.११.२०१८ अन्वये रु.९८०,३३,८०,०२४/-(अक्षरी रुपये नऊशे ऐंशी कोटी तेहतीस लाख ऐंशी हजार चोवीस) एवढया रकमेस मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्प टप्पा १ ला सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. तदनंतर गृह विभाग शासन निर्णय दि.२६.०२.२०१९ अन्वये मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्प टप्पा १ व टप्पा २ या दोन्ही प्रकल्पास रु.१३०३.५६ कोटी(अक्षरी रुपये एक हजार तीनशे तीन कोटी छप्पन लाख ) एवढ्या रकमेस सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे.

उच्चस्तरीय शक्तीप्रदान समितीच्या बैठकीमधील निर्णयाच्या अनुषंगाने मुंबई शहर सीसीटीव्ही टप्पा १ हा प्रकल्प दि.०५.०९.२०१७ पासून कार्यान्वित (Go-Live) झाला असे दिनांक ०८.११.२०१७ च्या पत्रान्वये घोषित करण्यात आले आहे.

मुंबई सीसीटीव्ही टप्पा १ या प्रकल्पाचा कार्यान्वयन देखभाल दुरुस्ती कालावधी (operation & Maintenance) दि.४/९/२०२२ रोजी पूर्ण झाला आहे. उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या संदर्भाधीन क्र.११ दि.२२/९/२०२२ रोजीच्या बैठकीत, मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पाच्या कार्यान्वयन देखभाल दुरुस्तीसाठी (operation & Maintenance) मे.एल अँड टी कंपनी यांना एका वर्षासाठी दि.४ सप्टेंबर, २०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यास मंजूरी देण्यात आली आहे. मे. लार्सन ॲन्ड टुब्रो लि. या कंपनीसोबत दि.०७.०२.२०१५ रोजी शासनाने केलेल्या कराराच्या अनुषंगाने अटी शर्तीवर सदर मुदतवाढ देण्यात आल्याचे तसेच पुढील एक वर्ष कालावधीसाठी forecast of price सादर करण्याबाबत प्रकल्पाचे सिस्टीम इंटिग्रेटर, मे.एल अँड टी कंपनी यांना संदर्भाधीन क्र.१२, दि.१९/१०/२०२२ च्या पत्रान्वये कळविण्यात आले. त्यावर त्यांनी पुढील एक वर्ष कालावधीसाठीचे forecast of price सादर केले. त्यानंतर पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या अध्यक्षतेखाली दि.१/२/२०२३ व दि.२३/२/२०२३ रोजी प्रकल्प अंमलबजावणी समितीची (PIC) बैठक झाली. सदर बैठकीमध्ये झालेल्या निर्णयानुसार, दि.१४/३/२०२३ रोजी उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीची बैठक आयोजित करण्यात आली. बैठकीमध्ये मे.एल अँड टी कंपनी यांना मुंबई सीसीटीव्ही प्रकल्पाचा कार्यान्वयन देखभाल दुरुस्तीच्या (operation & Maintenance) ६ व्या वर्षासाठी दि.५/९/२०२२ ते दि.४/९/२०२३ या कालावधीकरिता रु.९०,३५,५८,९९३/- (जीएसटी वगळून) इतक्या खर्चास मान्यता देण्यात आली आहे. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**<u>शासन निर्णय</u>:-**

मुंबई शहरावर दि.२६.११.२००८ रोजी झालेल्या दहशतवादी हल्ला व दादर, ऑपेरा हाऊस, झवेरी बाजार या ठिकाणी झालेल्या अतिरेकी हल्ल्यानंतर सुरक्षिततेच्या दृष्टीने मुंबई शहरात सीसीटीव्ही प्रकल्प राबविण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. मुंबई शहरात सुरक्षेच्या दृष्टीने सीसीटीव्ही कॅमेरे बसविण्यासाठी मे. लार्सन ॲन्ड टुब्रो लि. या कंपनीसोबत दि.०७.०२.२०१५ रोजी शासनाने करार केला आहे .

२. मुंबई सीसीटीव्ही प्रकल्पाचा कार्यान्वयन देखभाल दुरुस्ती कालावधी (operation & Maintenance) दि.४/९/२०२२ रोजी पूर्ण झाला आहे. उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या दि.१४/३/२०२३ रोजीच्या बैठकीत झालेल्या निर्णयानुसार, मे.एल अँड टी कंपनी यांना मुंबई सीसीटीव्ही प्रकल्पाचा कार्यान्वयन देखभाल दुरुस्तीच्या (operation & Maintenance) ६ व्या वर्षासाठी दि.५/९/२०२२ ते दि.४/९/२०२३ या कालावधीकरिता रु.९०,३५,५८,९९३/- (जीएसटी वगळून) इतक्या खर्चास खालील अटी शर्तीसह प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

- SLA and Terms and Conditions will be the same as per the signed contract dated 7 the February 2015.
- L &T to ensure all Phase I and Phase II cameras are viewed and recorded as per technical compliance
- L & T to upgrade all its VTS devices which currently function on 2 G/3G to 4G/5G compatibility networks.
- L&T is to maintain all the hardware till 4th September 2023 and should ensures that the Operation and Maintenance should function smoothly. L & T to repair/replace any hardware (non-functional ) to run the operation and maintenance smoothly.

३. यासाठी होणारा खर्च हा "मागणी क्र.बी-१०, ४०५५ - पोलीस यावरील भांडवली खर्च, ८०० इतर खर्च, (००) (०९) सीसीटीव्ही यंत्रणा बसविणे (४०५५ ०२२३) या अंतर्गत ५२- यंत्रसामग्री साधनसामग्री" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३२९१९०८२६४३२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KAILAS ARJUN GAIKWAD

Digitally signed by KAILAS ARJUN GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=b31abfcb1894c4c597cc944f19a89f474e7b98a708cc03eb46cd241a604d42bb, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=47D160717AE29C2D2661B5275D8B9B4CFAE93893BE65A27853145A4C04D865CD, cn=KAILAS ARJUN GAIKWAD
Date: 2023.03.29 19:19:55 +05'30'

**( कैलास गायकवाड )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव (विशेष) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
५. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
७. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
८. महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.

९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

१०.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

११.मे. लार्सन अँड टुब्रो कं. लि, एल अँड टी हाऊस, एन. एम. मार्ग, बलार्ड इस्टेट, मुंबई-१.

१२.वित्त विभाग, व्यय-७/वित्तीय सुधारणा, मंत्रालय, मुंबई

१३. क.अ.अर्थ-१/गृह विभाग, मंत्रालय मुंबई.

१४.निवडनस्ती, पोल-३.